**राज्यामध्ये कृषिभूषण (सेंद्रीय शेती) पुरस्कार सुरू करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धविकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सेंशेयो २०१०/प्र.क्र.१८४/१७ अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई – ४०००३२.**
**दिनांक :-२३ सप्टेंबर, २०१०.**

**<u>प्रस्तावना :</u>**

रासायनिक खते व किटकनाशकांच्या अधिक वापरामुळे पर्यावरणाचे संतुलन बिघडून जमिनीतील जैविक घटकांचा विनाश झाल्याने जमिनी मृतवत झाल्या आहेत. पर्यायाने खतांची कार्यक्षमताही कमी झाली. कमी कार्यक्षमतेमुळे रासायनिक खतांचा पुन्हा जादाचा वापर व परत जमिनीचे नुकसान अशा चक्रात सध्याची आधुनिक उत्पादन पध्दती अडकलेली आहे. किटकनाशकांच्या विषारी अवशेषामुळे निर्यातीत सुध्दा अडचणी येत आहेत. या सर्व समस्यांवर मात करण्यासाठी **सेंद्रिय शेतीचा अवलंब** हा एक पर्याय पुढे येत आहे. सेंद्रिय शेतीमुळे शेतकऱ्यांना आर्थिक सुरक्षितता, उत्पादन खर्चात बचत, चांगले आणि सतत उत्पादन, नैसर्गिक संतुलन, मातीची शाश्वत उत्पादकता, जैविक विविधतेचे रक्षण, नैसर्गिक संसाधनाची जोपासना, अन्नाची शाश्वती इ. फायदे होतात.

राज्यात सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन देण्यासाठी शासनामार्फत सेंद्रीय शेती प्रोत्साहनपर विविध योजनांची अंमलबजावणी करण्यात येत आहे. परिणामी सेंद्रिय शेतीकडे शेतकऱ्यांचा कल वाढत असल्याचे दिसून येत आहे. राज्यामध्ये सेंद्रीय शेतीचा प्रसार व प्रचार व्हावा तसेच सेंद्रीय शेती करण्यासाठी प्रोत्साहन द्यावे या उद्देशाने सेंद्रिय शेतीत उल्लेखनीय काम करणाऱ्या शेतकऱ्यांना शासनामार्फत कृषिभूषण (सेंद्रिय शेती) पुरस्कार देवून सन्मानीत करण्याचे शासनाचे विचाराधीन आहे.

**<u>शासन निर्णय :</u>**

राज्यामध्ये सेंद्रीय शेतीचा प्रसार व प्रचार करण्यासाठी तसेच सेंद्रीय शेती करण्यास प्रोत्साहन देण्यासाठी दरवर्षी **कृषिभूषण (सेंद्रिय शेती) पुरस्कार** देण्याबाबत शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**अ) <u>पुरस्काराचे स्वरूप</u> :-**

राज्यात एकूण **तीन** कृषिभूषण (सेंद्रीय शेती) पुरस्कार **शेतकरी/संस्था** यांना देण्यात येणार आहेत. या पुरस्कारासाठी प्रति पुरस्कार **रु.५०,०००/-** रोख रक्कम, स्मृतीचिन्ह, सन्मानपत्र व सपत्निक सत्कार करण्यात येणार आहे.

**ब) योजनेचे उद्देश :-**

१) सेंद्रिय शेतीबाबतच्या तंत्रज्ञानाचा वापर व नाविन्यपुर्ण उपक्रमांना चालना देणे.

२) राज्यातील शेतकऱ्यांना सेंद्रिय शेतीमाल उत्पादनासाठी प्रोत्साहन देणे.

३) शेतकऱ्यांमध्ये सेंद्रिय शेतीबाबत जागृती निर्माण करुन सेंद्रिय शेतीमालाचा गुणात्मक दर्जा वाढविणे.

४) शेतकऱ्यांवरील कर्जाचा बोजा नाहीसा करुन त्यांना स्वाभिमानी व स्वावलंबी बनविणे.

५) सेंद्रिय शेती पध्दतीचा सामाजिक व पर्यावरणात्मक परिणामासाठी अवलंब करणे.

६) ग्रामीण स्तरावर रोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देवून शहराकडे होणारे स्थलांतरण थांबविणे.

**क) पुरस्कारासाठी पात्रता :-**

कृषिभूषण (सेंद्रिय शेती) पुरस्कारासाठी सेंद्रिय शेतीमध्ये भरीव व उल्लेखनिय काम करणारे शेतकरी/संस्था पात्र राहतील.

**ड) अटी व शर्ती :-**

**(एक) वैयक्तिक निकष -**

१) शेतकऱ्यांचे नावे स्वतःची/कौटुंबिक जमीन असावी आणि त्याप्रमाणे त्यांनी ८ अ व ७/१२ उतारा सादर करणे आवश्यक आहे.

२) शेतकरी आपले शेतात स्वतःच शेतीची सर्व कामे उदा. नांगरणी ते मळणीपर्यंत करणारा असावा.

३) त्यांचे वास्तव्य शेतीच्या गावात/शेतावर कायम स्वरुपी असावे. शेतात कायमस्वरुपी घर बांधुन राहणाऱ्या शेतकऱ्यांस प्राधान्य देण्यात येईल.

४) शेतकरी स्वतः साक्षर असावा. स्वतःच्या कुटुंबातील मुलामुलीचे शिक्षणास प्राधान्य देणारा असावा.

५) शेतकऱ्याचे कुटुंब मर्यादित असावे. त्याप्रित्यर्थ स्वकुटुंबाची माहिती त्याने प्रस्तावासोबत देणे आवश्यक राहील.

६) शेतकरी कोणत्याही कर्जाबाबत सहकारी संस्थेचा, शासनाचा, राष्ट्रीयकृत बँकेचा थकबाकीदार नसावा.

७) शेतकरी एखाद्या शासनपुरस्कृत संस्थेकडून अगर शासनाकडून मानधन किंवा वेतन किंवा निवृत्तीवेतन घेत नसावा.

८) चारित्र्य निर्दोष असलेबाबत संबंधीत पोलिस अधिक्षक यांचा दाखला इ. सर्व कागदपत्रें प्रस्तावासोबत सादर करावीत.

९) कृषि विभागामार्फत यापूर्वी कृषिरत्न, कृषिभूषण, जिजामाता कृषिभूषण, शेतीमित्र, शेतीनिष्ठ, उद्यानपंडीत पुरस्कार मिळालेले शेतकरी कृषिभूषण (सेंद्रिय शेती) पुरस्कारासाठी पात्र ठरणार नाहीत.

१०) सेंद्रिय शेती स्पर्धा, प्रदर्शने, चर्चासत्रे, सेंद्रिय शेती मेळाव्यातील मार्गदर्शन इ. मधील सहभाग / पारितोषिकाबाबतचा तपशिल पुराव्यासह देण्यात यावा. त्याबाबतची छायाचित्रे, प्रमाणपत्र इ. सादर करणे आवश्यक राहील.

११) सदरचा शेतकरी त्याच्या आर्थिक परिस्थितीनुसार नियमित बचत करणारा, काटकसरी असावा. शेतीच्या व्यवहारात उत्पन्नातून शेतकऱ्याने बॅंकेमध्ये, पोस्टामध्ये, रोखीमध्ये किंवा शासनाच्या इतर बचत प्रकारामध्ये आपली बचत ठेवलेली असावी.

१२) सेंद्रिय शेती तंत्रज्ञान प्रसाराबाबत सेंद्रिय शेतीबाबतचे नाविन्यपूर्ण उपक्रम राबविणे, त्याबाबतच्या आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करणे, स्वतः सेंद्रिय शेती गटाच्या माध्यमातून, कार्यशाळांमधून, प्रदर्शनामधील सहभाग, सेंद्रिय शेती प्रचार व प्रसारासाठी केलेले कार्य इत्यादीतून कार्य केलेले असावे. त्याप्रित्यर्थ आवश्यक कागदपत्रे सादर करणे आवश्यक राहील.

**(दोन) शेतीव्यवसायासंबंधीचे निकष** -

शेतकऱ्याने सेंद्रिय शेतीमध्ये स्वतःचे प्रयत्नांनी, परिश्रमाने व स्वावलंबनाने प्रगती केलेली असावी. त्यामध्ये-

१) मूलस्थानी मृद व जलसंधारणाच्या उपायांचा अवलंब केलेला असावा.

२) गांडूळ कल्चर/गांडूळ खत युनिटच्या माध्यमातून सेंद्रिय खत तयार करुन त्याचा वापर स्वतः करणारा असावा तसेच इतर शेतकऱ्यांनाही प्रोत्साहन देणारा असावा.

३) बायोडायनामिक कंपोस्ट/नाडेप यासारख्या सुधारीत पध्दतीने सेंद्रिय खत तयार करुन स्वतःच्या शेतामध्ये वापरणारा असावा. सेंद्रिय शेती तंत्रज्ञानाच्या अवलंबनासाठी आवश्यक सेंद्रिय निविष्ठा तयार करण्यासाठी देशी गायीचे मलमुत्र, इ. उपयुक्त असल्याने त्याचेकडे किमान एक देशी गाय असणे आवश्यक आहे.

४) रासायनिक पदार्थांचा वापर न करता आणि बाजारातून सेंद्रिय निविष्ठा खरेदी न करता स्वतःच्या शेतावर दशपर्णीअर्क, जिवामृत, बीजामृत, निंबोळी अर्क, निंबोळी पावडर यासारख्या सेंद्रिय निविष्ठा वापरणारा असावा.

५) पीक संरक्षणासाठी एकात्मिक कीड व्यवस्थापन, जैविक किटकनाशके, विविध पीक पध्दती, सजीवांचे सहाय्य, वनस्पतीजन्य किटकनाशके वापरणारा असावा.

६) सेंद्रिय शेती पध्दतीचा किमान पाच वर्षे अवलंब केलेला असावा. सेंद्रिय शेती मालाचे शेती उत्पादनाचे प्रमाणिकरण केले असल्यास प्राधान्य देण्यात यावे.

७) एकात्मिक शेती पध्दतीचा अवलंब करणारा म्हणजेच शेतीपुरक व्यवसाय उदा. दु ग्धव्यवसाय, कुक्कटपालन, रेशीमउत्पादन, मधुमक्षिकापालन, मत्स्यव्यवसाय इ. चा अवलंब करणारा असावा.

८) संघटनात्मक कौशल्याच्या सहाय्याने परिसरातील शेतकऱ्यांचे सेंद्रिय शेतीबाबतचे नेतृत्व करुन शेतकऱ्यांना सेंद्रिय शेतीचे महत्व पटवून देवून त्यांना सेंद्रिय शेती करण्यास प्रवृत्त करणारा असावा.

९) सिंचनाच्या पाण्याचा कार्यक्षमरित्या वापर करुन सेंद्रिय पध्दतीने उत्पादन घेण्यासाठी सुक्ष्म सिंचन पध्दतीचा वापर करणारा असावा.

१०) परिसरातील शेतकऱ्यांसमवेत समुह पध्दतीने सेंद्रिय शेती करुन सेंद्रिय शेतीमालास बाजारपेठ उपलब्ध करुन देण्यासाठी नेतृत्व करणारा असावा.

११) शेतीमध्ये उत्पादित होणाऱ्या व वाया जाणाऱ्या पिकांच्या संपूर्ण अवशेषांपासून सेंदिय खत निर्माण करुन वापरणारा तसेच गोबरगॅस, सौरउर्जा, पवनउर्जा यासारख्या अपारंपारिक पध्दतींचा वापर करणारा असावा.

**(तीन) संस्थेचे निकष –**

**(अ) वैयक्तिक** -

१. संस्था नोंदणीकृत असावी (स्थापन झाल्याचा रजिस्ट्रेशन नंबर व दिनांक असणे आवश्यक आहे).

२. संस्थेकडे असलेले तांत्रिक मनुष्यबळ तपशिलासह (शैक्षणिक पात्रता, अनुभव, अवगत केलेले तंत्रज्ञान, तंत्रज्ञान अवगत करण्यासाठी घेतलेले प्रशिक्षण इ.) माहिती असावी.

३. संस्थेचे कार्यक्षेत्र दर्शविणारी माहिती असावी.

४. संस्थेचे एकूण सभासदांची संख्या नमूद करण्यात यावी.

५. संस्थेचे उद्देश/संस्थेची घटना/नियमावली इ. माहिती असावी.

६. संस्थेशी संलग्न इतर संस्थांची माहिती असावी.

**(ब) व्यावसायिक पातळी -**

१. संस्थेने सेंद्रिय शेतीविषयामध्ये विविध क्षेत्रात केलेल्या उल्लेखनीय कामाची माहिती असावी.

२. संस्थेने सेंद्रिय शेती प्रमाणिकरणासाठी केलेल्या कामाची व इतर संस्थांना केलेल्या सहाय्याची माहिती असावी.

३. सेंद्रिय शेती तंत्रज्ञानाचा प्रचार व प्रसार याबाबतची माहिती असावी.

४. सेंद्रिय शेती उत्पादित मालाची साठवणूक, पणन, निर्यात यामध्ये केलेल्या कामाची माहिती असावी.

५. संस्थेने सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन देण्याकरिता सभासदाव्यतिरीक्त इतर शेतक-यांसाठी केलेले योगदान जसे

- सेंद्रिय शेतीचे गट/समूह स्थापन केलेले असावेत.
- सेंद्रिय शेतीमालाचा ब्रँड विकसित केलेला असावा.
- सेंद्रिय शेतीसाठी स्थानिक निविष्ठा करण्याकरिता शेतक-यांना मार्गदर्शन केलेले असावे.

- स्थानिक निविष्ठा विकसित केलेल्या असाव्यात.
- प्रात्यक्षिके, प्रशिक्षण, तंत्रज्ञान हस्तांतरण इ. बाबत मार्गदर्शन केलेले असावे.

६. रोजगार संधी/ सेंद्रिय शेतीमालावर आधारित कृषि उद्योजकता विकास इ. बाबत कार्य केलेले असावे.

७. सेंद्रिय शेती अभियान यशस्वी करण्यासाठी दिलेले योगदान तसेच तंत्रज्ञान विस्तारासाठी आणि शेतक-यांना सेंद्रिय शेतीकडे आकृष्ट करण्यासाठी विविध माध्यमाद्वारे प्रचार व प्रसार केलेला असावा.

८. संस्थेने सेंद्रिय शेतीविषयक प्रचार व प्रसार यासाठी केलेले लेखन/प्रकाशन याची माहिती असावी.

९. संस्थेने इतर नाविन्यपूर्ण केलेल्या बाबींची माहिती असावी.

१०. संस्थेने मागील २-३ वर्षात सेंद्रिय शेतीकरिता केलेल्या कामाची माहिती असावी.

**इ) <u>योजनेची अमलबजावणी</u> :-**

**(एक) जिल्हास्तर -**

सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी त्यांचे स्तरावरुन योजनेला स्थानिक वृत्तपत्रांद्वारे व्यापक प्रमाणावर प्रसिध्दी द्यावी तसेच योजनेच्या मार्गदर्शक सूचना तालुका व मंडळ स्तरापर्यंत उपलब्ध करुन देवून पुरेसे प्रस्ताव जिल्हा स्तरावर प्राप्त करुन घेण्यात यावेत.

जिल्हास्तरावर कृषि उपसंचालक, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे अध्यक्षतेखाली तपासणी पथक व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय समितीची स्थापना करावी. या तपासणी पथकाने निवड केलेल्या शेतकऱ्यांच्या शेतावर प्रत्यक्ष जावून पाहणी करावी व आपला अहवाल जिल्हास्तरीय समितीकडे सादर करावा. जिल्हास्तरीय समितीने प्राप्त प्रस्तावांची छाननी करुन प्रत्येक जिल्हयातून दोन प्रस्ताव जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे शिफारशीसह संबंधित विभागीय कृषि सहसंचालक यांचेकडे पाठवावेत. प्रस्तावासोबत शेतकऱ्यांचा परिचय लेख थोडक्यात स्वतंत्रपणे लिहून पाठवावा. तपासणी पथक व जिल्हास्तरीय समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.

**तपासणी पथक-**

१) कृषि उपसंचालक, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी - अध्यक्ष

२) मोहिम अधिकारी, जिल्हा परिषद - सदस्य

३) तंत्र अधिकारी - उपविभागीय कृषि अधिकारी (ज्या उपविभागाचा प्रस्ताव नसेल असा) - सदस्य

**जिल्हास्तरीय समिती —**

१) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी - अध्यक्ष

२) सामाजिक वनीकरण विभागाचा जिल्हा स्तरावरील प्रमुख - सदस्य

३) पशुसंवर्धन विभागाचा जिल्हा स्तरावरील प्रमुख- सदस्य

४) उपविभागीय कृषि अधिकारी (सर्व)- सदस्य

५) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील उपसंचालक - सदस्य सचिव

**(दोन) विभागस्तर -**

विभाग स्तरावर प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांची छाननी करण्यासाठी विभागीय स्तरावर खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

**विभागस्तरीय समिती —**

| | |
|---|---|
| १) विभागीय कृषि सहसंचालक - | अध्यक्ष |
| २) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (अधिनस्त) - | सदस्य |
| ३) प्रमाणिकरण यंत्रणेचा प्रतिनिधी (संबंधित प्रक्षेत्रातील यंत्रणेचे) - | सदस्य |
| ४) संबंधित कृषि विद्यापीठातील सेंद्रिय शेतीशी निगडीत शास्त्रज्ञ - | सदस्य |
| ५) विभागीय कृषि सहसंचालक कार्यालयातील जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी — | सदस्य सचिव |

सदर समितीने सर्व प्राप्त प्रस्तावांची छाननी करुन विभागातून ३ प्रस्ताव अभिप्रायासह प्राधान्यक्रम देवून कृषि आयुक्तालयास पुढील कार्यवाहीसाठी दोन प्रतीत सादर करावा.

**(तीन) आयुक्तालय स्तर -**

आयुक्तालय स्तरावर प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी करून पुढील कार्यवाहीसाठी शासनाकडे सादर करावेत.

**(चार) शासन स्तर** -

शासन स्तरावर खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येवून सदर समिती प्राप्त प्रस्तावांमधून प्रत्येक विभागातून एका शेतकऱ्याची पुरस्कारासाठी निवड करील.

**शासन स्तरावर समिती -**

| | |
|---|---|
| १) मा. मंत्री (कृषी) - | अध्यक्ष |
| २) मा. राज्यमंत्री (कृषि) - | उपाध्यक्ष |
| ३) मा. प्रधान सचिव (कृषि व फलोत्पादन) - | सदस्य |
| ४) आयुक्त (कृषि) - | सदस्य |

५) संचालक (फलोत्पादन) - सदस्य

६) कुलगुरु - कृषि विद्यापीठे (सर्व) - सदस्य

७) व्यवस्थापकीय संचालक (एनएचएम) - सदस्य

८) उपसचिव (निविष्ठा व गुणनियंत्रण) - सदस्य सचिव

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००९१६२०४८२८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने.

(वा. म. तुरूकमाने)

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव,
मा. मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (मत्स्यव्यवसाय) यांचे खाजगी सचिव,
मा. मुख्यसचिव यांचे सचिव,
मा. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक,
सर्व कलगुरू (कृषि विद्यापीठे),
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, कृषि आयुक्तालय, पुणे,
संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे,
व्यवस्थापकीय संचालक, (नॅशनल हॉर्टीकल्चर मिशन), पुणे,
सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय,पुणे
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी

**प्रत माहीतीसाठी अग्रेषीतः**

सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव,

सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

राज्यातील सर्व सन्मानीय लोकसभा सदस्य,

राज्यातील सर्व सन्मानीय राज्यसभा सदस्य,

राज्यातील सर्व सन्मानीय विधानसभा सदस्य,

राज्यातील सर्व सन्मानीय विधानपरीषद सदस्य,

सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

सर्व उपसचिव/अवरसचिव/कक्ष अधिकारी, कृषि विभाग.

उपसचिव, विधानमंडळ समिती, (१० प्रती),

निवड नस्ती

**प्रपत्र अ**

## कृषिभूषण (सेंद्रिय शेती) पुरस्कार योजनेंतर्गत प्रस्तावित शेतकऱ्याची वैयक्तिक माहिती

| | | |
|---|---|---|
| १ | शेतकऱ्याचे संपूर्ण नांव | |
| २ | संपूर्ण पत्ता | |
| ३ | कायमचा पत्ता<br>गाव/पोष्टाचे नाव<br>तालुका व जिल्हा | |
| ४ | पत्रव्यवहारासाठी पूर्ण पत्ता<br>गाव/पोष्टाचे नाव<br>तालुका व जिल्हा | |
| ५ | संपर्कासाठी दुरध्वनी / भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ६ | जन्मतारीख व वय | |
| ७ | मागासवर्गीय, अनुसुचित जाती, जमाती, भटक्या/विमुक्त जातीपैकी असल्यास तपशिलवार माहिती द्यावी | |
| ८ | शैक्षणिक पात्रता | |
| ९ | व्यक्तीचा व्यवसाय | |
| १० | व्यक्तीचे कार्य व कार्यक्षेत्र सविस्तर माहिती द्यावी | |
| ११ | त्यांना शासन / शासन पुरस्कृत संस्थेमार्फत पगार पेन्शन मिळते काय ? | |
| १२ | पूर्वी मिळालेला सन्मान/पुरस्कार आणि कोणत्या वर्षी व कशासाठी. | |
| १३ | चारित्र कसे आहे (सोबत जि.पो.अ.दाखला असावा) | |
| १४ | व्यक्तीची प्रकाशने (असल्यास) | |
| १५ | वरील व्यक्तीचे केलेले काम सर्वसामान्य शेतक-यांना उपयोगी मार्गदर्शक कसे तसेच त्यांचे काम अतिउत्कृष्ट किंवा उल्लेखनिय कसे याबाबत सविस्तर माहिती. | |
| १६ | अधिक काही माहिती असल्यास | |
| १७ | ------------- यांनी प्रत्यक्ष शेतीस भेट देऊन प्रस्ताव निकषाप्रमाणे योग्य असल्यास शिफारशीसह अभिप्राय द्यावेत. | |

**सही/-** **सही/-**

-------------------- ------------------------

----------- -----------------

**प्रपत्र ब**

**कृषिभूषण (सेंद्रिय शेती) पुरस्कार योजनेंतर्गत प्रस्तावित शेतकऱ्याची शेतीव्यवसायाबाबतची माहिती**

| | | |
|---|---|---|
| १ | शेतकऱ्याचे नांव व पत्ता | |
| २ | धारण केलेले एकूण क्षेत्र ( ८ अ प्रमाणे) | |
| ३ | त्याने लागवड केलेल्या क्षेत्रापैकी प्रमाणिकरण झालेले क्षेत्र (पिकनिहाय) | |
| ४ | जमिनीच्या विकासासाठी सेंद्रिय शेतीची कोणकोणती तंत्रे अवलंबिली ? | |
| ५ | पिक उत्पादनासाठी तसेच रोग व किडीच्या नियंत्रणासाठी कोणकोणत्या उपाययोजना केल्या ? | |
| ६ | सिंचनाच्या पाण्याचा किफायतशीर वापर / ठिबक / तुषार वापर करतात काय? | |
| ७ | सेंद्रिय शेतीबाबत स्वतः विकसित केलेले तंत्रज्ञान | |
| ८ | कोणकोणत्या नाविन्यपुर्ण सेंद्रिय शेतीच्या बाबींचा अवलंब केला ? | |
| ९ | स्थानिक व परदेशी बाजारपेठांमध्ये निर्यातीबाबत माहिती? | |
| १२ | सेंद्रिय शेतीस सुरु केलेले पुरक व्यवसाय कोणते व त्यातुन कोणते व किती उत्पादन मिळते? | |
| १३ | सेंद्रिय शेती गट/उत्पादक संघ/निर्यात संघ स्थापन केले आहेत का? | |
| १५ | इतर सामाजिक कार्य | |

**सही/-** **सही/-**

------------------------- ------------------

--------- -----------

**प्रपत्र - क**

**कृषिभूषण (सेंद्रिय शेती) पुरस्कार योजनेंतर्गत प्रस्तावित सहकारी संस्थेची / बागायतदाराच्या संस्थेची माहिती**

| अ.क्र | बाब | |
|---|---|---|
| १ | संहकारी/बागायतदाराच्या संस्थांचे नाव व सविस्तर पत्ता गाव / तालुका/जिल्हा दुरध्वनी क्र./ ई-मेल / कोड क्रमांकासह | |
| २ | संस्था स्थापन दिनांक व रजिस्ट्रेशन नंबर | |
| ३ | संपर्क व्यक्तिचे नाव व कायमचा सविस्तर पत्ता<br>गाव / पोष्टाचे नाव तालुका जिल्हा | |
| ४ | पत्र व्यवहाराचा पत्ता<br>गाव / पोष्टाचे नाव<br>तालुका जिल्हा | |
| ५ | संस्थेकडे असलेले तांत्रिक मनुष्यबळ तपशिलासह (शै.पात्रता, अनुभव, अवगत केलेले तंत्रज्ञान, तंत्रज्ञान अवगत करण्यासाठी घेतलेले प्रशिक्षण इ.) | |
| ६ | संस्थेचे एकुण सभासद | |
| ७ | संस्थेचे कार्यक्षेत्र | |
| ८ | संस्थेचे उद्देश /संस्थेची घटना/नियमावली (एमओए) | |
| ९ | संस्थेशी इतर संलग्न संस्था | |
| १० | संस्थेने सेंद्रिय शेती विषयामध्ये विविध क्षेत्रात केलेल्या उल्लेखनीय कामाचा संक्षिप्त गोषवारा. | |
| ११ | संस्थेने सेंद्रिय शेती प्रमाणिकरण, सेंद्रिय शेती तंत्रज्ञानाचा प्रचार व प्रसार, सेंद्रिय शेती उत्पादित मालाची साठवणूक , पणन निर्यात यामध्ये केलेले काम | |
| १२ | संस्थेने सेंद्रिय शेतीस प्रोत्साहन देण्याकरिता सभासदांव्यतिरिक्त इतर शेतक-यांसाठी केलेले योगदान जसे सेंद्रिय शेतीचे गट/समुह स्थापन करणे/सेंद्रिय शेतीमालाचा ब्रँड विकसित करणे/सेंद्रिय शेतीसाठी स्थानिक निविष्ठा करण्यासाठी शेतकऱ्यांना मार्गदर्शन करणे, स्थानिक निविष्ठा विकसित करणे, तंत्रज्ञान हस्तांतरण, प्रात्यक्षिके, प्रशिक्षण, रोजगार संधी /सेंद्रिय शेतीमालावर आधारीत कृषि उद्योजकता विकास इ., सेंद्रिय शेती अभियान यशस्वी करण्यासाठी दिलेले योगदान तसेच तंत्रज्ञान विस्तारासाठी आणि शेतकऱ्यांना सेंद्रिय शेतीकडे आकृष्ट करण्यासाठी विविध माध्यमांद्वारे केलेला प्रचार व प्रसार | |
| १३ | संस्थने सेंद्रिय शेतीविषयक प्रचार व प्रसार यासाठी केलेले लेखन/प्रकाशन त्याचा तपशील द्यावा( प्रतीसह) | |
| १४ | संस्थेने लेख / पुस्तिका प्रसिध्द केली असल्यास त्याचा तपशील द्यावा ( प्रतीसह) | |
| १४ | इतर नाविन्यपुर्ण बाबींचा तपशील | |

**संस्था / संपर्क व्यक्तीची स्वाक्षरी**